GR 200409301411054001-1201

<u>महात्मा ज्योतिराव फुले जल व भूमि संधारण अभियान.</u>

बक्षिस योजना.

**महाराष्ट्र शासन,**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

शासन निर्णय क्र.जलसं-२००३/प्र.क्र.६९/जल-८,

दिनांक : १८ जून , २००३.

वाचा : १) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.जलसं-२००२/प्र.क्र.५८१/जल-७, दि.१८ फेब्रुवारी, २००१.

२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.जलसं-२००२/प्र.क्र.६७०/जल-७, दि.२१ नोव्हेंबर, २००२.

**<u>प्रस्तावना :</u>**

राज्यातील ग्रामीण भागातील जल व भूमि संधारण, पाणलोट व्यवस्थापन, पडीक जमीन विकास, वृक्ष लागवड व नैसर्गिक साधनसंपत्तीत सुधारणा व वाढ करण्याच्या दृष्टीने महात्मा ज्योतिराव फुले जल व भूमी संधारण अभियान दि.१ मे, २००२ पासून स्थानिक स्वराज्य संस्था, स्वयंसेवी संस्था तसेच ग्रामीण भागातील जनतेचा लोकसहभागाद्वारे राबविण्यासाठी सुरु करण्यात आले. राज्यातील जलसंधारण कार्यक्रमाला गती देण्यासाठी ग्रामीण भागातील सामान्य जनतेमध्ये जल भूमि आणि इतर नैसर्गिक साधनसंपत्ती संवर्धनाबाबत आस्था निर्माण व्हावी व या संदर्भात केलेल्या चांगल्या कार्याचा गौरव व्हावा या उद्देशाने जिल्हा परिषदा व पंचायत समित्या, ग्राम पंचायती, स्वयंसेवी संस्था व शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना पारितोषिक देण्याबाबत संदर्भ क्र.२ अन्वये निर्गमित केलेला शासन निर्णय रद्द करण्यात येत असून सुधारित शासन निर्णय शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :</u>**

राज्यातील ग्रामीण भागातील जल व भूमि संधारण, पाणलोट व्यवस्थापन, पडीक जमीन विकास, वृक्ष लागवड व नैसर्गिक साधनसंपत्तीत सुधारणा व वाढ करण्याच्या दृष्टीने महात्मा ज्योतिराव फुले जल व भूमि संधारण अभियानांतर्गत ज्या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या, ग्राम पंचायती, स्वयंसेवी संस्था/शासकीय अधिकारी/कर्मचारी हिरिरीने सहभागी होऊन महाराष्ट्र राज्यात उत्कृष्टपणे कार्य करतील अशा जिल्हा परिषदा, पंचायत समित्या, स्वयंसेवी संस्था यांना तसेच शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना शासनातर्फे "महात्मा ज्योतिराव फुले जल व भूमि संधारण पुरस्कार" देऊन गौरव करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

महाराष्ट्र राज्यात उत्कृष्ट कार्य करणा-या जिल्हा परिषद, पंचायत समिती, ग्राम पंचायत, स्वयंसेवी संस्था व शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना सदर पुरस्कार दरवर्षी दिनांक १० मे या जलसंधारण

[illegible] करावयाचे राहील. या अभियानातील सहभागाबाबत अटी व शर्ती पुढील प्रमाणे आहेत :-

**१) पात्रता :**

ज्या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या, ग्राम पंचायती, स्वयंसेवी संस्था तसेच जे शासकीय अधिकारी/कर्मचारी वरील संदर्भ क्र.१ मधील दि.२८ फेब्रुवारी, २००१ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आलेल्या अभियानात सहभागी झालेल्यांना आता नोंदणी केल्यास या पुरस्कारासाठी पात्र समजण्यात येईल.

**२) सहभाग व नोंदणी :**

सदर बक्षिस योजनेत सहभागी होणा-या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या, ग्राम पंचायती, स्वयंसेवी संस्था तसेच शासकीय अधिकारी/कर्मचारी यांनी जिल्हा स्तरावर प्रत्येक वर्षी दि. १ मार्च ते १५ सप्टेंबर या कालावधीत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडे सहभागाबाबत नांव नोंदणी / पंजीकरण करणे अनिवार्य आहे.

**३) नोंदणी शुल्क :**

सदर अभियानातील सहभागासाठी नोंदणी शुल्क रु.१००/- इतके आकारले जाईल. तथापि, शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचेकडून नोंदणी शुल्क आकारण्यात येणार नाही.

**४) पुरस्कारासाठी वरील संस्था अथवा स्थानिक स्वराज्य संस्था निवडण्यासाठी खालील कामांचा समावेश असेल :-**

**ग्राम पंचायत** :

१) लोकसहभागातून गाव तलाव / माजी मालगुजारी तलाव इत्यादी तलावांचे पुनर्जिवन व गाळ काढणे
२) लोकसहभागातून कच्चे अथवा वनराई बंधारे बांधणे
३) विहिरी अथवा विंधण विहिरींचे पुनर्भरण
४) लोकसहभागातून सार्वजनिक जागेवरील वृक्ष संवर्धन
५) लोकसहभागातून नाला बंडींग / भूमिगत बंधारे बांधणे
६) पाण्याचे स्त्रोत बळकट करणे
७) छतावरील पाण्याचे संवर्धन ( नियोजन )

**पंचायत समिती :**

१) अस्तित्वात असलेल्या लोक सहभागातील पध्दती प्रमाणे किती ग्राम पंचायती प्रोत्साहित केल्या
२) यशस्वी पाणलोट अथवा पडिक जमीन विकासाची कामे
३) राज्य शासन संपूर्ण ग्रामीण योजना / रोजगार हमी योजना या कार्यक्रमातून विकसित केलेले पाणलोट.

जिल्हा पातळी :

१) जलसंधारणाच्या लोक सहभागातील पध्दती प्रमाण करता ग्राम पंचायती प्रोत्साहित करण्या

२) यशस्वी पाणलोट अथवा पडिक जमीन विकासाची कामे

३) राज्य शासन संपूर्ण ग्रामीण योजना / रोजगार हमी योजना या कार्यक्रमांतून विकसित केलेले पाणलोट.

## मूल्यमापनासाठी निकष व गुणतालिका

### मार्गदर्शक तत्वे

१) **नियोजन**

(अ) प्रस्तुत शासन निर्णयात परिच्छेद क्रमांक ३ मध्ये नमूद केलेल्या कामांपैकी कोणती कामे घेण्यात येतील ते ग्राम पंचायतीने ठरावाद्वारे निश्चित करावे.

(ब) ठरविलेल्या कामाचे स्थळनिहाय अंदाजपत्रक / आराखडा ते पूर्ण करण्याचे नियोजन करावे.

(क) सदर कामांना योग्य स्तरावर प्रशासकीय मान्यता / तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

२) **लोकसहभाग**

(अ) श्रमदानाने योजना राबविण्यासाठी लोकांनी दिलेला सहभाग.

(ब) सहभाग म्हणजेच कामाच्या एकूण किंमतीतील, मजूर घटकाच्या किंमतीच्या कमीत कमी २०% खर्चाचा भार सहकार्याने उचलणे.

३) **पात्रतेचे निकष**

(अ) परिच्छेद क्रमांक ३ मध्ये नमूद केल्या नुसार नोंदणीकृत ग्रामपंचायती स्पर्धेस पात्र ठरतील

(ब) ज्या ग्रामपंचायतीत एकूण ७ कामांपैकी कमीत कमी ४ कामे हाती घेतील त्या स्पर्धेस पात्र ठरतील.

(क) कमीत कमी २०% लोकसहभाग आवश्यक आहे.

(ड) नोंदणी झाल्यानंतर प्रत्यक्षात काम सुरु करुन पूर्ण केलेल्या कामांचे मूल्यमापन केले जाईल.

४) **गुणतालीका**

अ) परिच्छेद ४ मध्ये नमूद केलेल्या कामांपैकी कार्यान्वित करण्यात येणा-या कामांची प्रगती १०० टक्के असली पाहिजे.

ब) किमान ६० टक्क्यांपेक्षा अधिक गुण मिळविणा-या संस्थांनाच पारितोषिकासाठी पात्र समजण्यात येईल.

| प्रस्तावित गुण | | | |
|---|---|---|---|
| नियोजन | लोकसहभाग | कामाची प्रगती | उद्दिष्टाची साध्यता |
| २० | ४० | २० | २० |

मूल्यमापनासाठी विविध समित्यांचे गठण :-

या अभियानांतर्गत पुरस्कारासाठी प्रत्येक जिल्ह्यातून स्वायत्त संस्था/ स्वयंसेवी संस्था/ शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांची निवड खालील प्रमाणे समित्यांमार्फत करण्यात येईल :-

समित्यांची रचना खालीलप्रमाणे असेल.

अ) जिल्हा स्तरीय निवड समिती :

| | | |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | सदस्य |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी | सदस्य सचिव |
| ३. | जिल्हयातील मातृ संघाभावी संस्था | सदस्य |
| ४. | जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| ५. | कार्यकारी अभियंता (स्थानिक स्तर) | सदस्य |
| ६. | उप वनसंरक्षक | सदस्य |
| ७. | वरिष्ठ भूवैज्ञानिक (GSDA) | सदस्य |

समितीची कार्यकक्षा :-

१. सदर शासन निर्णयात उल्लेखिलेल्या निकषानुसार केलेल्या कामाचे मूल्यमापन करणे.
२. या अभियानांतर्गत प्रत्येक जिल्हयामधून खालील पुरस्कार प्रस्तुत शासन निर्णयात नमूद केलेल्या निकषानुसार प्रस्तावित करतील.
   अ) एक पंचायत समिती
   ब) एक ग्रामपंचायत
   क) एक स्वयंसेवी संस्था
   ड) शासकीय अधिकारी / कर्मचारी
३. कार्यक्रम राबविताना उद्भवलेल्या अडी-अडचणींचे निराकरण करणे.
४. विभागीयस्तरीय समितीस पुरस्कारास पात्र अशा प्रत्येक वर्गातील एका नावाची शिफारस करणे.

ब) विभागीय स्तरीय समिती -

| | | |
|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त | अध्यक्ष |
| २ | विभागातील जिल्हाधिकारी (सर्व) | सदस्य |
| ३ | विभागातील मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व) | सदस्य |
| ४ | विभागातील मातृ संघाभावी संस्था | सदस्य |
| ५ | उप विकास आयुक्त | सदस्य सचिव |
| ६ | वन संरक्षक | सदस्य |
| ७ | सह संचालक, सामाजिक वनीकरण | सदस्य |
| ८ | उप संचालक ( GSDA) | सदस्य |
| ९ | मुख्य अभियंता, पाटबंधारे | सदस्य |
| १० | अधीक्षक अभियंता (स्थानिक स्तर ) | सदस्य |
| ११ | सहसंचालक, कृषि | सदस्य |

**समितीची कार्यकक्षा :-**

१ सदर शासन निर्णयात उल्लेखिलेल्या निकषानुसार केलेल्या कामाचे मुल्यमापन करणे.

२. या अभियानांतर्गत प्रत्येक जिल्ह्यामधून खालील पुरस्कार प्रस्तावित करतील.

   अ) एक जिल्हा परिषद

   ब) एक पंचायत समिती

   क) एक स्वयंसेवी संस्था

   ड) शासकीय अधिकारी / कर्मचारी

३. कार्यक्रम राबविताना उद्‌भवलेल्या अडी-अडचणींचे निराकरण करणे.

४. राज्यस्तरीय समितीस पुरस्कारास पात्र अशा प्रत्येक वर्गातील एका नावाची शिफारस करणे.

**४) राज्यस्तरीय समिती :-**

| | | |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री, जलसंधारण | अध्यक्ष |
| २ | मा.राज्यमंत्री, जलसंधारण | उपाध्यक्ष |
| ३ | सचिव, जलसंधारण | सदस्य |
| ४ | सचिव, कृषि | सदस्य |
| ५ | सचिव, ग्राम विकास विभाग | सदस्य |
| ६ | संचालक, सामाजिक वनीकरण | सदस्य |
| ७ | संचालक, मृदसंधारण | सदस्य |
| ८ | प्रधान मुख्य वनसंरक्षक | सदस्य |
| ९ | उप सचिव, जलसंधारण | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :-**

१. सदर शासन निर्णयात उल्लेखिलेल्या निकषानुसार विभागीय समितीने शिफारस केलेल्या कामाचे पुनर्विलोकन / मुल्यमापन करणे.

२. या अभियानांतर्गत प्रत्येक जिल्ह्यामधून खालील पुरस्कार प्रस्तावित करतील.

   अ) एक जिल्हा परिषद

   ब) एक पंचायत समिती

   क) एक ग्रामपंचायत

   ड) एक स्वयंसेवी संस्था

   इ) शासकीय अधिकारी / कर्मचारी

**<u>पुरस्काराचे अथवा बक्षिसाचे स्वरूप खालीलप्रमाणे राहील.</u>**

| | | |
|---|---|---|
| **<u>जिल्हा स्तर</u>** : | ग्राम पंचायत | रु.१.५० लाख |
| | पंचायत समिती | रु.२.५० लाख |
| | स्वयंसेवी संस्था | रु.१.०० लाख |
| | अधिकारी /कर्मचारी | प्रमाणपत्र / पदक |
| **<u>विभागीय स्तर</u>** : | ग्रामपंचायत | रु.३.०० लाख |
| | पंचायत समिती | रु.५.०० लाख |
| | जिल्हा परिषद | रु.७.०० लाख |
| | स्वयंसेवी संस्था | रु.२.०० लाख |
| | अधिकारी / कर्मचारी | प्रमाणपत्र / पदक |
| **<u>राज्य स्तर</u>** : | ग्रामपंचायत | रु.५.०० लाख |
| | पंचायत समिती | रु.१०.०० लाख |
| | जिल्हा परिषद | रु.१५.०० लाख |
| | स्वयंसेवी संस्था | रु.४.०० लाख |
| | अधिकारी / कर्मचारी | प्रमाणपत्र / वेतनवाढ |

सदर शासन निर्णयान्वये स्थापन करण्यांत आलेली विभाग स्तरीय व राज्यस्तरीय निवड समितीचा कार्यकाल हा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत कार्यान्वित राहील.

स्पर्धा अधिक निस्पृहपणे व्हावी म्हणून, खालील सदस्यांचे एक तपासणी पथक राहील.

१. [illegible] संस्था प्रतिनिधी
२. संचालक (सामाजिक वनीकरण)
३. अधीक्षक अभियंता (स्थानिक स्तर)
४. उप आयुक्त (विकास)

या तपासणी पथकाने तपासावयाच्या विभागाची यादी खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | विभागीय तपासणी पथक | तपासावयाचे विभाग |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | कोकण | नागपूर |
| २ | पुणे | नाशिक |
| ३ | नाशिक | औरंगाबाद |
| ४ | औरंगाबाद | पुणे |
| ५ | अमरावती | कोकण |
| ६ | नागपूर | अमरावती |

चालू आर्थिक वर्षातील ( १ एप्रिल २००३ ते ३१ मार्च २००४ या कालावधीतील ) कामेच फक्त निकषासाठी ग्राह्य धरण्यात येतील. व त्यांचे मूल्यमापन करण्यात येईल याची दखल घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ना. बा. पाटील

( ना. बा. पाटील )
सचिव, जलसंधारण.

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे उप सचिव,
मा.मंत्री (जलसंधारण) व मा.राज्यमंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
मा.प्रमुख सल्लागार (पडीक जमिन विकास) एकात्मिक पडीक जमिन विकास मिशन यांचे खाजगी सचिव
मा.अध्यक्ष, जलसंधारण सल्लागार परिषद यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव,
प्रधान सचिव/सचिव,(नियोजन/वित्त/आदिवासी/कृषि/वने/ग्राम विकास/रोजगार व स्वयंरोजगार
महासंचालक, माहिती व जनसंपर्क (प्रसिध्दीकरीता),
सर्व विभागीय आयुक्त,
जिल्हाधिकारी (सर्व)
प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशिक्षण संस्था, पुणे,
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे
कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर
कुलगुरु, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
कुलगुरु, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला
कुलगुरु, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली
सर्व सहाय्यक आयुक्त (विकास)
सर्व प्रकल्प संचालक/कार्यक्रम अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा
सर्व सहसंचालक (कृषि)